**श्री.पेट्रस गायकवाड, तत्का. अधीक्षक, जिल्हा कारागृह, जळगाव यांचे निलंबन समाप्त करून सेवेत पुन:स्थापित करून नियुक्ती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन आदेश क्र. डीईएस-११२२/प्र.क्र.२१९(२) / तुरूंग-१**

दुसरा मजला, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- १२ जून, २०२५

**<u>संदर्भ</u>** :- १) सा.प्र.वि., शासन निर्णय क्र. निप्रआ -१३१४/प्र.क्र.८६/११-अ, दिनांक १४.१०.२०११.

२) सा.प्र.वि, शासन निर्णय क्र. अभियो-१३१४/प्र.क्र.८६/११-अ, दिनांक ३१.०१.२०१५.

३) सा.प्र.वि, शासन निर्णय क्र. निप्रआ-१३१४/प्र.क्र.८६/११-अ, दिनांक ०९.०७.२०१९.

४) गृह विभाग, शासन आदेश क्र. डीईएस-११२२/प्र.क्र.२१९ / तुरूंग-१, दिनांक ०६.०४.२०२३.

**आदेश**

श्री.पेट्रस गायकवाड, तत्का. अधीक्षक, जिल्हा कारागृह, जळगाव यांना संदर्भ क्रमांक ४ येथील शासन आदेशानुसार शासन सेवेतून निलंबित करण्यात आले आहे.

२. संदर्भ क्रमांक १, २ व ३ येथील शासन निर्णयान्वये श्री. गायकवाड यांच्या निलंबनाचा आढावा घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने, श्री. गायकवाड यांच्याविरूध्द प्रस्तावित विभागीय चौकशीच्या अधीन त्यांचे निलंबन समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांना शासकीय सेवेत अधिक्षक, जिल्हा कारागृह, बीड या पदावर पुन:स्थापित करण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्व मान्यतेने सदर पदस्थापना करण्यात येत आहेत.

४. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. श्री. गायकवाड यांनी पदस्थापनेचा कार्यभार तात्काळ स्वीकारावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२५०६१२१४४२५११८२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=1dfb457576797050f19aafaa495673fc843c789942459cd39fc5561071b4a70c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=79C09BA352C5B3E65B259113F1CDCFAB29FB961D4EA9A24411D7F622D2ED20BF, cn=NARAYAN BIRA MANE
Date: 2025.06.12 14:44:07 +05'30'

**(नारायण माने)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.पेट्रस गायकवाड, तत्का. अधीक्षक, जळगाव जिल्हा कारागृह (अपर पोलिस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधार सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत).

**प्रत,**

१. अपर पोलिस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधार सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.

यांना कळविण्यात येते की, सदर आदेश श्री.पेट्रस गायकवाड, तत्का. अधीक्षक, जळगाव जिल्हा कारागृह यांना समक्ष देऊन ते मिळाल्याची त्यांची स्वाक्षरी व दिनांकासह पोच दुसऱ्या प्रतीवर घेऊन ती पोच शासनास पाठवावी.

२.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३.कारागृह उपमहानिरीक्षक, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर.

४. कारागृह उपमहानिरीक्षक, नाशिक विभाग, नाशिक

५. अधीक्षक, जिल्हा कारागृह, अहिल्यानगर

६.सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता, धाराशिव.

७.जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.

८.निवडनस्ती (पोल-१०)